**ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी सुधारित मार्गदर्शक सूचना..**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन शुध्दिपत्रक, क्रमांक ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ३१ जानेवारी, २०११**

**वाचा :-** १) शासन निर्णय समक्रमाकं, दि. १७ मार्च, २०१०
२) शासन शुध्दिपत्रक समक्रमाकं, दि. ३० ऑगस्ट, २०१०

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांनुसार ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाची अंमलबजावणी अधिकाधिक परिणामकारक व्हावी व शासनाच्या मागणी आधारित लोकसहभागाच्या धोरणाची ती अधिक सुसंगत असावी यावी म्हणून संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. संदर्भ क्र. २ येथील शासन शुद्धीपत्रकान्वये या शासन निर्णयाच्या परिच्छेद २.३ व ११ मध्ये सुधारणा देखील करण्यात आली होती.

परिच्छेद क्र. ११ मध्ये सुधारणा करताना लोकवर्गणी जमा करण्याच्या शासन स्थायी आदेशांच्या तरतूदीमध्ये विसंगती झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आल्याने त्यास सूधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दिपत्रक :**

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र. **११** पुढीलप्रमाणे वाचण्यात यावा.

**११.** सर्वसाधारण क्षेत्रासाठी किमान ५ टक्के व दलित तसेच आदिवासी क्षेत्रासाठी किमान १ टक्के लोकसहभागाची रोख रक्कम ग्राम आरोग्य, पोषण, पाणी पुरवठा, स्वच्छता व पर्यावरण समितीच्या खात्यावर रोखीने जमा केल्यानंतर शासन सहभागाच्या रकमेपैकी ३० टक्के निधी पहिला हप्ता म्हणून समितीच्या खात्यावर जमा करण्यात येईल. ह्या निधीतून समितीने केवळ स्त्रोत विकासाचे काम हाती घ्यावे व पूर्ण करावे. स्त्रोताच्या सक्षमतेबाबत भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेचे योग्यता प्रामाणपत्र घेतल्यानंतरच इतर कामे हाती घ्यावीत. उर्वरित लोकवर्गणीच्या रकमेपैकी सर्वसाधारण क्षेत्रासाठी ५ टक्के व दलित व आदिवासी क्षेत्रासाठी ४ टक्के लोकसहभागाची रक्कम परिस्थितीनुरूप रोखीने किंवा श्रमदान / वस्तुदानाद्वारे जमा केल्यानंतर दुस-या हप्त्याची ३० टक्के रक्कम देण्यात यावी. या रकमेचा पूर्ण विनियोग झाल्यानंतर ३० टक्केचा तिसरा हप्ता वितरीत करण्यात यावा. उर्वरित १० टक्के निधी योजना पुढील १ वर्ष सुरळीत चालविल्यानंतर समितीस अदा करण्यात येईल.

२.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०१३११६१०५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
(प्राजक्ता लवंगारे- वर्मा)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

*मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,*

*मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव*
*विभागीय आयुक्त (सर्व)*
*सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई*
*संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे*
*सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद*
*सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,*
*सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद*
*महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*
*महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*

*मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई*

*उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर*
*प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा सर्व*
*प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण सर्व*
*जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा सर्व*
*कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण सर्व*
*गट विकास अधिकारी, पंचायत समिती सर्व*
*नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई*
*वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,*
*ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई*
*मंत्रालयातील इतर सर्व विभाग,*
*पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने*
*निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७*